# फक्त 'हिक' म्हण!

## एक तुर्की लोककथा



कोणे एके काळी असंख्य जीवांनी भरलेल्या या सृष्टीमध्ये ‘बडबड करणे’ हे पाप मानले जाई. या काळात एका शहरात एक व्यक्ती राहात होती. त्या व्यक्तिकडे एक अतिशय भोळाभाबडा सेवक काम करत होता. त्याचे नाव होते हसन!

हसन एक चांगला सेवक होता. पण त्याच्यामध्ये एक कमतरता होती. त्याला जे काम सांगितले जाई, ते तो लगेच विसरत असे.





"हसन!" एकदा त्याच्या मालकाने त्याला बोलावले. “हे पैसे घे, बाजारात जा आणि थोडेसे मीठ आण."

हसनने पैसे आपल्या पायघोळ विजारीच्या मोठ्या खिशात ठेवले. त्याच्या गावात मीठाला ‘हिक’ म्हणत असत. “हिक,“ हसन विचार करू लागला, “यावेळी काहीही करून आपण ‘हिक’ हा शब्द विसरायचा नाही. पण हा शब्द लक्षात कसा ठेवायचा?” शेवटी त्याने मनाशी ठरवले, “आपण बाजारात जाईपर्यंत ‘हिक’ हा शब्द सतत उच्चारत राहायचं. म्हणजे आपल्याला काय खरेदी करायचं आहे, ते लक्षात राहील.”

मग हसन “हिक,हिक,हिक,” असं म्हणत धुळीने भरलेल्या रस्त्यावर आपल्या चपला घासत घासत चालू लागला.

वाटेत एक शेतकरी पुलाखाली वाहाणाऱ्या ओढ्यात गळ टाकून बसला होता. हसनने त्याला बघितले. तोंडाने “हिक,हिक,हिक,” हे त्याचे बडबडणे सुरुच होते.



हसनला गळाला मासा लागताना बघायला आवडायचे. तो त्या शेतकऱ्याजवळ गेला. पण आपण बाजारात चाललोय, हे विसरायचे नाही म्हणून, “हिक,हिक,हिक,” अशी त्याच्या तोंडाची टकळी सतत चालूच होती.

तुर्कीच्या काही भागात 'हिक' या शब्दाचा अर्थ आहे, 'काहीच नाही'. हसन ‘हिक’ म्हणतोय, म्हणून आपल्या गळाला काहीच लागत नाही, असे शेतकऱ्याला वाटले.



शेतकऱ्याला राग आला. “असं नको बोलूस!” तो हसनवर ओरडला.

हसन आश्चर्यचकित झाला, "मग काय बोलू?" त्याने विचारले.

शेतकरी म्हणाला, “पाच-दहा तरी लटकावेत, पाच-दहा तरी लटकावेत, असं म्हण. समजलास का?”





शेतकऱ्याने जे सांगितले ते लगेच विसरू नये, म्हणून हसन तत्परतेने बोलू लागला, “पाच-दहा तरी लटकावेत, पाच-दहा तरी लटकावेत.” शेवटी हे आपल्या चांगलं लक्षात राहिलं आहे, अशी त्याची खात्री पटली.

मग तो धुळीने भरलेल्या रस्त्यावरून पुन्हा आपल्या चपला घासत घासत बाजाराकडे चालू लागला. त्याच्या तोंडाची टकळी सतत चालूच होती, “पाच-दहा तरी लटकावेत, पाच-दहा तरी लटकावेत.”

हसन आश्चर्यचकित झाला. “मग काय बोलणं योग्य आहे?" त्याने विचारले.

तो माणूस म्हणाला, “ईश्वर याच्या आत्म्याला शांती देवो, ईश्वर याच्या आत्म्याला शांती देवो, असं म्हण.”





पुढे वाटेत त्याला एक प्रेतयात्रा दिसली. तो थांबून पाहू लागला. “पाच-दहा तरी लटकावेत, पाच-दहा तरी लटकावेत,” त्याचे बडबडणे सुरूच होते.

हसनची टकळी ऐकून प्रेतयात्रेतील एका माणसाला राग आला. त्याने हसनला सुनावले, “असं बोलणं योग्य नाही.”

हसन तत्परतेने म्हणू लागला, “ईश्वर याच्या आत्म्याला शांती देवो, ईश्वर याच्या आत्म्याला शांती देवो.” हे आपल्या चांगलं लक्षात राहिलं आहे, अशी त्याची खात्री पटली.

मग तो धुळीने भरलेल्या रस्त्यावरून आपल्या चपला घासत घासत बाजाराकडे चालू लागला. अचानक एक विचित्र दुर्गंध त्याच्या नाकात शिरला. रस्त्याच्या कडेला एक मासा मरून पडला होता. “ईश्वर याच्या आत्म्याला शांती देवो, ईश्वर याच्या आत्म्याला शांती देवो,” हसनच्या तोंडाची टकळी चालूच होती.





त्याच्या जवळून जाणारा एक माणूस थांबला. तो हसनजवळ आला. त्याने खाली वाकून बघितले. मृत माशाशिवाय त्याला काहीही दिसले नाही.

“असं काय वेड्यासारखं बोलतोयस?”

हसन पूर्वीपेक्षा जास्त आश्चर्यचकित झाला. "मग काय बोलणं शहाण्यासारखं असेल?" त्याने विचारले.

तो माणूस म्हणाला, “म्हण, शी! किती घाणेरडा वास येतोय, शी! किती घाणेरडा वास येतोय.”

हसनच्या नाकाला दुर्गंध जाणवतच होता. तो म्हणू लागला, “शी! किती घाणेरडा वास येतोय, शी! किती घाणेरडा वास येतोय.”

असं म्हणत म्हणत तो पुढे चालू लागला. आता हे शब्द त्याच्या चांगले लक्षात राहिले.



थोडंसं पुढे, नकतंच स्नान करून बाहेर पडलेल्या स्वच्छ, टवटवीत तीन स्त्रिया त्याला सामोऱ्या आल्या. हसनचे तोंड सुरुच होते, “शी! किती घाणेरडा वास येतोय, शी! किती घाणेरडा वास येतोय.”



हे ऐकताच त्या स्त्रियांनी आपल्या हातातील पाण्याची भांडी खाली ठेवली आणि त्या हसनवर दगड फेकत डाफरू लागल्या, “असं कसं म्हणतोस? धाडस तरी कसं होतं तुझं असं म्हणायचं?”



गरीब बिचारा हसन गोंधळून गेला. "मग मी काय बोलायला हवं?" त्याने स्त्रियांना विचारले.

एक स्त्री म्हणाली, “तू म्हणायला हवंस, व्वा, किती सुंदर! किती छान!”

"हो," इतर स्त्रिया म्हणाल्या. “तू म्हणायला हवंस, व्वा, किती सुंदर! किती छान!”



हसनने झुकून त्यांना अभिवादन केले आणि तो म्हणाला, “व्वा, किती सुंदर! किती छान!”

तिन्ही स्त्रियांनी मान हलवून पसंती दर्शवली आणि स्मित केले. हसन पुन्हा धुळीने भरलेल्या रस्त्यावरून आपल्या चपला घासत घासत बाजाराकडे चालू लागला. त्याच्या तोंडाची टकळी सुरू झाली, “व्वा, किती सुंदर! किती छान! व्वा, किती सुंदर! किती छान!”



वाटेत दोन माणसे आपापसांत मारामारी करत होते. हसन तिथे थांबला. जेव्हा एका माणसाने दुसऱ्याला ठोसा लगावला, तेव्हा हसनच्या तोंडून शब्द बाहेर पडले, “व्वा, किती सुंदर!” जेव्हा दुसऱ्या माणसाने पहिल्या माणसाला ठोसा मारला तेव्हा हसनच्या तोंडून आले,“किती छान!”



हसनची बडबड ऐकून त्या दोन माणसांना संताप आला. त्यांनी मारामारी थांबवली आणि हसनलाच ठोसे मारले. मग एकजण म्हणाला, “पुन्हा असं काही बोललास तर याद राख,” आणि त्याने हसनला आणखी एक ठोसा मारला.





घाबरून हसनने त्यांना विचारले, “मग मी बोलू तरी काय?”

दुसरा माणूस म्हणाला, “म्हण, सभ्य गृहस्थांनो, असे भांडू नका, मारामारी करू नका.”

“हो, असंच म्हणायला हवंस तू,” पहिला माणूस बोलला.

वाटेत चालत असताना हसन ते शब्द पुन्हापुन्हा उच्चारू लागला, “सभ्य गृहस्थांनो, असे भांडू नका, मारामारी करू नका. सभ्य गृहस्थांनो, असे भांडू नका, मारामारी करू नका.” थोड्याच वेळात हे शब्द त्याच्या चांगलेच लक्षात राहीले.



बाजाराजवळच्या रस्त्यावर दोन कुत्रे एकमेकांच्या अंगावर धावून जाताना हसनला दिसले. तो मजेत ते दृश्य पाहू लागला. तोंडाने बडबडू लागला, “सभ्य गृहस्थांनो, असे भांडू नका, मारामारी करू नका.”



त्याच्या जवळ उभा असलेला एक माणूस म्हणाला, "वेडा आहेस की काय? असं म्हणायचं नसतं."

हसनचे डोळे आश्चर्याने विस्फारले. तो म्हणाला, "मग मी काय बोलू?"





"अरे," तो म्हणाला, "आपण म्हणावे, हाड कुत्र्या! चल पळ कुत्र्या!"

हसन पुन्हा चालू लागला, "हाड कुत्र्या! चल पळ कुत्र्या! हाड कुत्र्या! चल पळ कुत्र्या!" असे म्हणत म्हणत हसन बाजारात पोहोचला.

बाजारात शिरल्यावर त्याला पहिल्याच दुकानात एक माणूस चपला बनवताना दिसला. त्या माणसाच्या तोंडात एक चामड्याचा तुकडा होता आणि तो त्याला हव्या तशा मापात घडवत होता. हसनचे शब्द त्याच्या कानावर पडले, “हाड कुत्र्या! चल पळ कुत्र्या!” त्या माणसाने तो चामड्याचा तुकडा थुंकला आणि तो रागाने ओरडला, “काय बोलतोयस तू? तूच कुत्रा आहेस."



आतापर्यंतच्या अनुभवांनी हसन पूर्णतः गोंधळला होता. "कृपया माझ्यावर रागावू नका,“ तो म्हणाला, “मी काय बोलू?"

चपला बनवणारा म्हणाला, "काहीच बोलू नकोस! फक्त 'हिक' म्हण.”



"ओहोsss, धन्यवाद!" हसन ओरडला, “हेच तर मला लक्षात ठेवायचं होतं."

आणखी थोडं पुढे जाऊन हसनने मीठ खरेदी केले.



समाप्त